**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या स्तरावर “फॅक्ट चेक युनिट” उभारण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मावज-२०२५ /२११/प्र.क्र. १०९/मावज १**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : १३ मे, २०२५.**

वाचा :-

१. उपसचिव (र.व का.१),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.८९/र.व का.१, दि.२९/०१/२०२५ चे इतिवृत्त

२. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र.नवमाध्यम-२०२५/संसंक/का-८/३४९, दि.२८.०३.२०२५.

प्रस्तावना:-

राज्य शासनाच्या विविध विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या लोकाभिमुख योजना, विकास प्रकल्प, विविध योजना, ध्येयधोरणे, महत्त्वाकांक्षी प्रकल्प, विकासकामे व लोककल्याणकारी योजनांच्या माहितीचा प्रचार-प्रसार होण्यासाठी, तसेच शासनाच्या प्रतिमा निर्मितीसाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत विविध प्रसारमाध्यमांच्या माध्यमातून प्रसिद्धीचे कार्य केले जाते.

मुद्रित माध्यमांमध्ये राज्य शासनाच्या विविध विभागांबद्दल प्रकाशित होणाऱ्या वस्तुस्थितीवर आधारित नसणाऱ्या बातम्यांवर माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत त्याचदिवशी वस्तुस्थितीवर आधारित माहिती / स्पष्टीकरण देण्याचे काम करण्यात येते. याशिवाय इलेक्ट्रॉनिक माध्यमांवर प्रसारित होणाऱ्या दिवसभरातील बातम्यांचे अवलोकन करुन त्यांना उचित प्रतिसाद देण्याचे काम महासंचालनालयांतर्गत “माध्यम प्रतिसाद केंद्रामार्फत” करण्यात येते. मात्र, अलिकडच्या काळात समाज आणि डिजिटल माध्यमांवर काही वेळा राज्य शासनाच्या कामकाजाबाबत नकारात्मक स्वरुपाच्या व समाजात भय पसरवणाऱ्या बातम्या अपलोड होत असतात. अशा बातम्या थोड्या कालावधीत या माध्यमांमार्फत वायरल होत असल्याने या माध्यमांत प्रसारित होणाऱ्या बातम्यांचे फॅक्ट चेक (सत्यशोधन) करणे अत्यंत गरजेचे ठरते.

फॅक्ट चेक युनिटमुळे शासनाबाबत जागरूकता, विश्वास आणि पारदर्शकता वाढण्यास तसेच आपत्ती व्यवस्थापन होण्यास मदत होणार असून संबंधित बातमीबाबतची वस्तुस्थिती जनतेसमोर येईल व चुकीच्या माहितीच्या ट्रेंडचा अंदाज लावणे शक्य होईल. याअनुषंगाने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयस्तरावर अद्ययावत प्रणालीच्या आधारे ‘फॅक्ट चेक युनिट’ उभारण्यासाठी संस्थेची निवड करून सेवा घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयस्तरावर “फॅक्ट चेक युनिट” उभारण्यासाठी या क्षेत्रातील कामाचा अनुभव असलेल्या संस्थेची निवड करून त्यांच्यामार्फत युनिट उभारणीसाठी सन २०२५-२६ मध्ये रु.५०.०० लक्ष इतक्या अनावर्ती खर्चास तसेच संबंधित युनिटच्या कामकाजात कालानुरुप वेळोवेळी आवश्यक सुधारणा करण्याकरीता सन २०२५-२६ पासून पुढील ५ वर्षांकरीता प्रत्येकवर्षी रु.४.५० कोटी याप्रमाणे येणाऱ्या आवर्ती अंदाजित खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. **फॅक्ट चेक युनिट उभारणीसाठी संस्थेची निवड प्रक्रिया -**

शासनाने विहित केलेल्या ई-निविदा पद्धतीचा अवलंब करुन सृजनात्मक व कलात्मक कामाचा (Creative Work) पुरेसा-व्यापक अनुभव आणि व्यावसायिक अर्हता प्राप्त संस्थेची निवड ई-निविदा आणि सादरीकरणाच्या एकत्रित गुणांच्या आधारे करण्यात येईल. कार्यादेश दिल्यानंतर पुढील ३ महिन्यांच्या कालावधीत निर्देशित कामे पूर्ण करणे गरजेचे राहिल. या कालावधीत काम न झाल्यास संस्थेला उचित कारणास्तव मुदतवाढ देण्याचे अधिकार महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांना असतील.

३. फॅक्ट चेक युनिटची उभारणी तसेच त्याचे कार्यवलन, संचलन व भविष्यात काही उद्भवल्यास त्यात करावयाच्या आवश्यक सुधारणा इ. बाबत निवड झालेल्या संस्थेकडून करुन घ्यावयाच्या कामांबाबत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने एक सुयोग्य कार्यपद्धती निश्चित करावी व या कार्यपद्धतीनुसार संस्थेसोबत करार करावा.

४. निवड केलेल्या संस्थेचे कामकाज असमाधानकारक आढळल्यास कोणत्याही टप्प्यावर सदर संस्थेचे कामकाज थांबविण्याचे अथवा रद्द करण्याचे अधिकार महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांना असतील.

**५. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने खालील अटीच्या अधीन राहून "फॅक्ट चेक युनिट" या उभारणी बाबतच्या प्रस्तावाची अंमलबजावणी करावी.**

(i) प्रस्तुत शासन निर्णयात नमूद केलेल्या वित्तीय मर्यादेमध्ये खर्च असावा. याकरिता कोणताही अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही. तसेच निवड करण्यात येणाऱ्या संस्थेकडून करण्यात येणाऱ्या कामाचे सनियंत्रण करण्याची जबाबदारी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाची राहील.

(ii) प्रस्तावित कामांसाठी दर/निवड करावयाच्या संस्था याबाबत सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय तसेच, ई-निविदा मागविण्याबाबतच्या सर्वसाधारण निर्देशाचे व अनुदेशाचे पालन करण्यात यावे.

(iii) प्रस्तावित खर्च करताना माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने सामान्य प्रशासन विभागाचे शासन निर्णय व वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतुदी तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय दि. ०१/१२/२०१६ व तद्नंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामध्ये नमुद केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

६. <u>वित्तीय अधिकारः-</u>

वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५, भाग- पहिला, उप विभाग- तीन, अ.क्र.४ मधील परिच्छेद क्रमांक २७ (२) (अ) नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार या प्रस्तावावर येणाऱ्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

७. <u>आर्थिक तरतूदः-</u>

सदर खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-६, प्रधानशीर्ष-२२२०-माहिती व प्रसिध्दी, ६० इतर, १०१ जाहिरात व दृक प्रसिध्दी (००) (०३) शासकीय योजनांची विशेष प्रसिध्दी मोहीम (कार्यक्रम), २६-जाहिरात व प्रसिध्दी (संगणक सांकेतांक क्र.२२२० ११७५) या लेखाशीर्षामधून उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येईल. याबाबतच्या अटी शर्ती शासनाने या संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार राहतील.

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९९/का.१४४३, दि.२५.०४.२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३३१/व्यय-४, दि.०२.०५.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५१३१३१६०४०९०००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA UTTAM PATIL

Digitally signed by SARIKA UTTAM PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=aa374b566d78c73e42804a2013f949268134e97ca9f7b2458c4247baf4c72175, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6401C88A0E0E14D8299DD0F14BA71419FCC6EE4670C193CBF1EB58127FA5947D, cn=SARIKA UTTAM PATIL
Date: 2025.05.13 13:16:52 +05'30'

**(सारिका उ. पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य.
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई, नागपूर,
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१५. सहसचिव, वित्त विभाग (कार्या-व्यय-४)मुंबई ,मंत्रालय,
१६. सहसचिव, नियोजन विभाग (कार्या-१४४३)मुंबई ,मंत्रालय,
१७. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१८. उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
२१. लेखाधिकारी (आहरण व संवितरण), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२. निवडनस्ती (मावज१-), सामान्य प्रशासन विभाग.
२३. भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.कुटीर क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२०.
२४. भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस(इं.) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५.
२५. राष्ट्रवादी कॉंग्रेस पक्ष, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडिया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई-४०० ०३८.
२६. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
२७. बहुजन समाज पक्ष, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, भूखंड क्र. ८३-ए, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०० ०७४.

२८. भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र समिती, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल मार्ग,मुंबई- ४०० ००४.

२९. भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पक्ष, महाराष्ट्र समिती, जनशक्ती सभागृह, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३.

३०. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-४०० ०२८.